मौजे रायपूर पाणी पुरवठा योजना, (ता.जि.बुलढाणा ) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. सुप्रभा २११४/प्र.क्र.२२९/पापु १३**

**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मुंबई-४०० ०३२**

**तारीख: ११ जानेवारी,२०१७**

**वाचा -**

१) ग्रामसभा ठराव क्र.४, दि.१९/०४/२००९

२) अधीक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती यांचे पत्र क्र.भानिक/अम/लेखा/तां.मं./२८५/२०१४, दिनांक २४/०७/२०१४

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा यांचे पत्र क्र.ग्रापापुउवि/८८०/२०१४,दि.०७/०८/२०१४

४) शासन निर्णय ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७,दि.२०/०२/२०१५.

५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबतचा शासन निर्णय ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७,दि.१५/०६/२०१५ व दि.१४ मार्च, २०१६.

**प्रस्तावना**

मौजे रायपूर पाणी पुरवठा योजना (ता. जि.बुलढाणा) नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१,५१,१४,१५३/- (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील ग्राम सभा ठरावान्वये मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी योजनेत तांत्रिक बदल व कामाच्या व्याप्तीत झालेल्या बदलामुळे खर्चात वाढ झाली. विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये प्रस्तुत योजनेच्या **रु.३,८२,०८,४००/-(ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. परिणामी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.३ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती सर्वंकष आढावा घेवून मौजे रायपूर पाणी पुरवठा योजना (ता. जि.बुलढाणा) या नळ पाणी पुरवठा योजनेची सुधारीत किंमत पुढील प्रमाणे :-

(रु.लाखात)

| अ.क्र. | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| **१** | **मूळ योजनेची किंमत** | **१५१.१४१५३** |
| २ | सुधारीत योजनेची प्रस्तावित किंमत (९ **%** इ.टी.पी.चार्जेससह) | ३४६.५२३६० |
| ३ | सुधारीत योजनेची प्रस्तावित किंमत ( इ.टी.पी.चार्जेस वगळुन) | ३०७.८१९८५ |
| ४ | सुधारीत योजनेच्या किंमतीमध्ये झालेली एकूण वाढ (९ **%** इ.टी.पी.चार्जेससह) | १९५.३८२०७ |
| **५** | **सुधारीत योजनेच्या किंमतीमध्ये झालेली एकूण वाढ ( इ.टी.पी.चार्जेस वगळुन)** | **१६९.१५७९०** |
| ६ | वाढीव किंमतीपैकी दरसूचीतील बदलांमुळे झालेली वाढ ( इ.टी.पी.चार्जेस वगळुन) | ६५.११३४८ |
| ७ | वाढीव किंमतीपैकी कामातील बदलांमुळे झालेली वाढ ( इ.टी.पी.चार्जेस वगळुन) | **१०४.०४४४२** |
| ८ | नवीन ४ उपांगाच्या कामामुळे वाढलेली किंमत ( इ.टी.पी.चार्जेस वगळुन) | **६६.६३९९३** |
| **९** | **नवीन ४ उपांगाच्या कामामुळे वाढलेली किंमत (९% इ.टी.पी.चार्जेस)** | **५.९९७५९** |
| **१०** | **विद्युत पुरवठा चार्जेस** | **११.००** |
| **११** | **योजनेची एकूण सुधारीत किंमत (क्र.१+५+९+१०)** | **३३७.२९७०२** |

मौजे रायपूर पाणी पुरवठा योजना (ता. जि.बुलढाणा) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रुपये ३,३७,२९,७०२/-(ढोबळ)** (**अक्षरी रुपये तीन कोटी सदोतीस लक्ष एकोणतीस हजार सातशे दोन फक्त)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

### अटी

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ६ महिन्यात पूर्ण करावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद बुलडाणा यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयातील निर्देशानुसार त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाची कार्यवाही करण्यात यावी.

९. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु.१,८६,१५,५४९/- (अक्षरी रुपये एक कोटी शहाऐंशी लक्ष पंधरा हजार पाचशे एकोण पन्नास फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०३/१४४३, दिनांक १७/०८/२०१६ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ ३२२/व्यय-३,दि.२४/१२/२०१६ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१११९०२८०६४९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2017.01.11 11:12:27 +05'30'

**( सु.दे.आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, बुलढाणा.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा
६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
९) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती.
१०) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अकोला.
११) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१२) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती

१३) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बुलढाणा.
१०) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, बुलढाणा.
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलढाणा.
१२) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी (कार्या-१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१७,१८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१५) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.